**कृषी उन्नती योजनेअंतर्गत राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियान राज्यात सन २०१६ - १७ मध्ये राबविण्यासाठी निधी वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रागते-१२१६/ प्र.क्र.१३२/४अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ०६ मार्च, २०१७.

<u>वाचा :-</u>

१) केंद्र शासनाने अभियाना संदर्भात http:// agricoop.nic.in/ dacdiviion/ NMOOP२०१४.pdf या संकेतस्थळावर उपलब्ध करून दिलेल्या मार्गदर्शक सूचना
२) केंद्र शासनाचे पत्र क्र.४-१/२०१६-NMOOP (Coord)/OS दि. १३ मे २०१६
३) शासन निर्णय क्रमांकः रागते-१२१६/प्र.क्र. १३२/४अे, दि. २६ मे,२०१६
४) कृषी सहकार व शेतकरी कल्याण विभाग, भारत सरकार यांचे पत्र क्र. १४-१/२०१५-CA. II, दिनांक ०१.०७.२०१६
५) कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.कृ.आ/वि.प्र.२/रागतेअ १६-१७/वि.मा.प.हप्ता/ अनु.वा /प्र.क्र.०८ /१९५/१६, दिनांक १२.०७.२०१६
६) शासन निर्णय क्रमांकः रागते-१२१६/प्र.क्र. १३२/४अे, दि. ३० जुलै,२०१६
७) शासन शुद्धीपत्रक क्रमांकः रागते-१२१६/प्र.क्र. १३२/४अे, दि. २ ऑगस्ट,२०१६
८) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थस-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. २० एप्रिल, २०१६
९) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. पूरक-२०१६/प्र.क्र.१२८/अर्थसंकल्प-३, दि.१२ ऑगस्ट, २०१६
१०) कृषी सहकार व शेतकरी कल्याण विभाग, भारत सरकार यांचे पत्र क्र. १४-१/२०१६-CA. II, दिनांक ३० जानेवारी, २०१७
११) कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.जा.क्र.वि.प्र.२/रागतेअ १६-१७/वि.मा.दु.हप्ता/ अनु.वा /प्र.क्र.०८ /४४/१७, दिनांक ०७ फेब्रुवारी, २०१७

**<u>प्रस्तावना :</u>**

केंद्र पुरस्कृत एकात्मिक गळीत धान्य,कडधान्य तेलताड व मका विकास कार्यक्रम राज्यात सन २०१३-१४ पर्यंत राबविण्यात येत होता. केंद्र शासनाने बाराव्या पंचवार्षिक योजनेमध्ये सर्व केंद्र पुरस्कृत योजनांची पुनर्रचना केली आहे. त्यानुसार सन २०१४-१५ पासून केंद्र पुरस्कृत एकात्मिक गळीतधान्य, कडधान्य, तेलताड व मका विकास (ISOPOM ) कार्यक्रमाऐवजी राष्ट्रीय तेलबिया व तेलताड [National Mission on Oilseed and Oil Palm (NMOOP)] या अभियानाची सुरवात केली आहे. सदर अभियानाअंतर्गत लघुअभियान- १ ( तेलबिया ), लघुअभियान-२ (तेलताड) व लघुअभियान-३ ( वृक्षआधारित तेलबिया ) या तीन लघुअभियानांचा समावेश आहे. या अभियानाच्या निधीत, सन २०१४-१५ या वर्षात केंद्र व राज्य हिश्याच्या प्रमाण ७५:२५ असे होते. सन २०१५-१६ पासून केंद्र शासनाने केंद्र व राज्य हिश्श्याचे प्रमाणात ६०:४० अशी सुधारणा केली आहे.

केंद्र शासनाने, सदर अभियानांतर्गत संदर्भाधीन अ.क्र.४ येथील तीन पत्रांन्वये केंद्र हिश्श्याच्या पहिल्या हप्त्यापोटी रु. २९६७.०५ लक्ष निधी वितरित केला होता. सदर निधीपैकी सर्वसाधारण प्रवर्गाचा निधी दि. ३० जुलै, २०१६ व दि. ६ सप्टेंबर, २०१६ च्या शासन निर्णयान्वये व अनुसूचित जाती प्रवर्गाचा निधी दि.२१ ऑक्टोबर, २०१६ च्या शासन निर्णयान्वये कृषी आयुक्तालयास वितरीत करण्यात आलेला आहे.

केंद्र शासनाने संदर्भाधीन अ.क्र.१० येथील दि. ३० जानेवारी, २०१७ च्या पत्रान्वये दुसऱ्या हप्त्यापोटी रु.६८५.२९ लक्ष एवढा निधी उप-अभियाननिहाय व प्रवर्गनिहाय वितरीत केला आहे. सदर तरतूदीतून सर्वसाधारण प्रवर्गासाठी, लघुअभियान-१ (तेलबिया) साठी रु.५४९.६३० लक्ष व लघुअभियान-३ (वृक्ष आधारीत तेलबिया) साठी रु.४.७७० लक्ष असा एकूण रु.५५४.४० लक्ष एवढा निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय

केंद्र पुरस्कृत कृषी उन्नती योजनेअंतर्गत राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियान ( National Mission on Oil seeds and Oil Palm) सन २०१६-१७ या वर्षात राज्यात राबविण्यासाठी सर्वसाधारण प्रवर्गासाठी केंद्र हिश्श्यापोटी रु.५५४.४० लक्ष (अक्षरी: रु. पाच कोटी चौप्पन लक्ष चाळीस हजार फक्त) एवढ्या निधीच्या कार्यक्रमास शासनाची वित्तीय मान्यता देण्यास येत आहे.

२. सदर निधी लघुअभियान निहाय खालीलप्रमाणे खर्च करण्यात यावा.

**(रूपये लक्ष मध्ये)**

| अ.क्र. | उपअभियानाचे नाव | केंद्र हिस्सा |
|---|---|---|
| १ | लघुअभियान-१ (तेलबिया ) | ५४९.६३० |
| २ | लघुअभियान-३ (वृक्ष आधारीत तेलबिया) | ४.७७० |

३) सदर खर्च खालील लेखाशिर्षांतर्गत सन २०१६-१७ च्या तरतुदीतुन भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक डी-३ ,**
२४०१,पीक संवर्धन,
११४ , तेलबियां
(००) (०६) कृषी उन्नती योजना- राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियान
लघुअभियान-१ (तेलबिया) (के.पु.यो)
(केंद्र हिस्सा ६० %)
(२४०१२४९८), ३३- अर्थसहाय्य

**मागणी क्रमांक डी-३ ,**
२४०१,पीक संवर्धन,
११४ , तेलबियां
(००) (१३) कृषी उन्नती योजना- राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियान

लघुअभियान-३ (तेलबिया) (वृक्षधारीत तेलबिया) (डी.एस.ए.ओ) (के.पु.यो)
(केंद्र हिस्सा ६०%)
(२४०१९४९२), ३३- अर्थसहाय्य

४) या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेल्या केंद्र हिश्श्याच्य प्रमाणात आवश्यक राज्य हिश्श्याच्या जिल्हा नियोजन समितीच्या अखत्यारीतील तरतूदीस वित्तिय मान्यता, संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडून देण्यात येईल.

५) सदर निधी खर्च करताना संदर्भाधीन अ.क्र. ६ येथील दि.३० जुलै,२०१६ च्या शासन निर्णयातील अटी, शर्ती व विहीत कार्य पदधतीचे पालन करण्यात यावे.

६) सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२० एप्रिल, २०१६ मधील अटींची पुर्तता करून व शासन परिपत्रक क्रमांक्र- २०१६/प्र.क्र.१२८/अर्थसंकल्प -३, दि. १२ ऑगस्ट, २०१६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन व अपर मुख्य सचिव (कृषी) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०६१६००५११७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Siddharth H Chaware

Digitally signed by Siddharth H Chaware
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Departmemt, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b4967ce0b5887c76156645efd775bffa84d471ca667907fda2cdbd1c76d7831f, cn=Siddharth H Chaware
Date: 2017.03.06 16:03:13 +05'30'

( सिध्दार्थ चवरे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
२. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे
३. संचालक ( फलोत्पादन ), कृषि आयुक्तालय, पुणे
४. सर्व संचालक / सहसंचालक, कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे-१
५. विभागीय आयुक्त (सर्व)
६. सर्व जिल्हाधिकारी,
७. सर्व सन्माननीय विधीमंडळ सदस्य
८. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
९. सर्व विभागीय कृषि सहसंचालक

१०.सर्व  जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
११. सर्व  कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद
१२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१३. सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद,
१४.व्यवस्थापकीय संचालक, कृषि उद्योग विकास महामंडळ मर्यादित, आरे, दुग्ध कॉलनी गोरेगाव (पूर्व), मुंबई-६५
१५.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, शास्त्रीनगर, अकोला.
१६.सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई
१७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ /२, मुंबई / नागपूर
१८. महालेखाकार( स्थानीय निकाय लेखापरिक्षा व लेखा), प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०० ०२०
१९.नियोजन विभाग (कार्यासन - १४३१ / कार्यासन - १४४४), मंत्रालय, मुंबई - ३२
२०.वित्त विभाग (व्यय-१) /अर्थसंकल्प -१३
२१.सामाजिक न्याय, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग / आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२२.ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई
२३.सर्व  सहसचिव /उपसचिव / अवर सचिव/ कक्ष अधिकारी (फक्त कृषी ), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२४.मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
२५.मा. राज्यमंत्री (कृषि ) यांचे खाजगी सचिव
२६.निवडनस्ती (कार्यासन-४अे, कृषी व पदुम विभाग ).